राज्यातील विविध जिल्हयातील पुर परिस्थितीमुळे बाधित झालेल्या नागरिकांना विशेष दराने मदत देण्याबाबत ..

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०१९/प्र.क्र.१५७/म-३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
तारीख: ०३ फेब्रुवारी, २०२०

**संदर्भ:** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस - २०१२/ प्र.क्र.१५७/ म-३, दिनांक ३०.१.२०१४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस - २०१५/ प्र.क्र.४०/ म-३, दिनांक १३.०५.२०१५
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस - २०१९/ प्र.क्र.१५७/ म-३, दिनांक ८.८.२०१९
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस - २०१९/ प्र.क्र.१७५/ म-३, दिनांक ११.९.२०१९
५) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्रमांक मह-३/नैआ/कावि/८२/२०२०, दि. १८.१.२०२०

**प्रस्तावना :**

राज्यातील विविध जिल्हयातील शहरी व ग्रामीण भागामध्ये दिनांक २६.७.२०१९ रोजी व त्यांनतर झालेल्या अतिवृष्टीमुळे पुराचे पाणी शहरी व ग्रामीण भागामध्ये पसरले. या पुर परिस्थितीमुळे बाधित झालेल्या कुटुंबियांना मदत देण्यासंदर्भात दिनांक ३०.७.२०१९ व दिनांक ७.८.२०१९ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत झालेल्या निर्णयाप्रमाणे पुर परिस्थितीमुळे बाधित झालेल्या नागरिकांना विशेष दराने मदत देण्याचा निर्णय संदर्भाधीन क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. त्यास अनुसरून विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक ५ अन्वये बाधित कुटुंबियांना मदतीचे वाटप करण्यासाठी अतिरिक्त निधी वितरित करण्याची मागणी केली आहे.

**शासन निर्णय :**

दिनांक २५.०९.२०१९ रोजी पुणे जिल्हयात झालेल्या अतिवृष्टीमुळे पुरपरिस्थिती निर्माण होवून घरांमध्ये पाणी शिरल्यामुळे झालेल्या नुकसानीसाठी संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या मदतीपैकी वाढीव दराने राज्य शासनाच्या निधीमधून बाधित कुटुंबियांना मदत देण्यासाठी रू. ६,४४,९०,०००/- (रूपये सहा कोटी चव्वेचाळीस लक्ष नव्वद हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रमाणे देण्यात येणारी अतिरिक्त मदत ही केवळ याच घटनेसाठी मर्यादित राहील. ही बाब अन्य प्रकरणी पुर्वोदाहरण म्हणून समजण्यात येऊ नये. तसेच प्रस्तुत निधी वितरित करताना संदर्भाधीन क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णयामधील अटी व शर्तीची पुर्तता करण्यात यावी.

३. राज्य शासनाकडून दयावयाच्या वाढीव मदतीसाठी होणारा उपरोक्त खर्च प्रधान लेखाशीर्ष २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य, (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२) (०१) रोख भत्ता मृत व्यक्तीच्या कुटुंबियांना सहाय्य व जखमींना मदत, ३१ सहाय्यक अनुदाने (२२४५ २१९४) या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा. या लेखाशीर्षाखाली वरील निधी विभागीय आयुक्त, पुणे यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्याची कार्यवाही कार्यासन म-११ यांनी करावी.

४. सदर निधी प्राप्त झाल्याबरोबर बाधित कुटुंबांना तात्काळ वितरीत करण्यात यावा. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची विभागीय आयुक्तांनी खात्री करावी. निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे, नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत होणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात याव्यात. झालेल्या खर्चाची महालेखापाल कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करून त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागाकडे सादर करण्यात यावे.कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. वितरित अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती विहित वेळेत शासनास समर्पित करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०३११४०३८९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.02.03 11:48:33 +05'30'

**( सु.ह.उमराणीकर )**
**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव ( वित्त),वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
२. विभागीय आयुक्त,पुणे विभाग, पुणे
३. जिल्हाधिकारी , पुणे
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
६. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे
८. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
९. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१०. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
११. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )